केंद्र शासनाच्या आदेशानुसार महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांच्या महागाई भत्त्यातील मुळ वेतनाच्या ५०% एवढा सममुल्य महागाई भत्ता मुळ वेतनामध्ये समाविष्ट करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग.**

शासन निर्णय, क्र. भापोसे-११०४/प्र.क्र.९४/०४/भापोसे सेल.
गृह विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२, दिनांक : १८ जून, २००४.

<u>पहा</u> : १) केंद्र शासनाच्या वित्त मंत्रालयाचे क्र.१०५/१/२००४/आयसी, दि.१.३.२००४ चे ज्ञापन.
२) शासन निर्णय गृह विभाग, क्रमांक आयपीएस ३००४/प्र.क्र.२७९/पोल-१, दिनांक ९.६.२००४

## कार्यालयीन आदेश

केंद्र शासनाच्या उपरोक्त संदर्भीत ज्ञापनातील आदेशानुसार महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना दिनांक १.४.२००४ रोजी त्यांच्या मुळ वेतनावर देय असणा-या ६१% महागाई भत्त्यापैकी मुळ वेतनाच्या ५०% एवढे सममुल्य महागाई भत्ता दिनांक १.४.२००४ पासून त्यांच्या मुळ वेतनामध्ये समाविष्ट करण्याचा निर्णय संदर्भीत क्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

२. सदर शासन निर्णयानुसार परिगणना करण्यात आल्यानंतर देय होणारे मुळ वेतन + ५०% महागाई वेतन (Dearness Pay) अशी एकुण वित्तलब्धी (मुळ वेतन + Dearness Pay) वर एकुण देय होणारा ११% महागाई भत्ता यांचा परिगणन तक्ता सोबत जोडला ,आहे. त्या परिगणन तक्त्यानुसार संबंधीत अधिका-यांचे दिनांक १.४.२००४ पासूनचे वेतन त्यांना अदा करण्यात यावे.

३. उपरोक्त संदर्भीत शासन निर्णयानुसार भापोसे अधिका-यांना दिनांक १.४.२००४ पासून देय असणा-या त्यांच्या मुळ वेतनाच्या ५०% एवढा सममुल्य महागाई भत्ता त्यांच्या मुळ वेतनामध्ये समाविष्ट करावयाचा आहे. एकुण वित्तलब्धी (Basic Pay + Dearness Pay) ही फक्त वेतनावरील महागाई भत्ता, घरभाडे भत्ता, वाहतूक भत्ता, निवृत्तीवेतन, बदली भत्ता, (CGHS) ची मासिक वर्गणी परवाना फी, विविध अग्रीमे भत्त्यांच्या परिगणनेकरीताच विचारात घ्यावयाची आहे. एकूण वित्तलब्धीमुळे भविष्य निर्वाह निधीची वर्गणी जर जास्त प्रमाणात वसूल करावी लागत असले तर ती नियमानुसार वसुल करण्यात यावी.

४. वेतनवाढी, पदोन्नती / पदावनतीच्या अनुषंगाने त्यांच्या मुळ वेतनामध्ये बदल झाल्यास त्यानुसार Dearness pay मध्येसुध्दा उचित बदल करुन देय होणारे वेतन व भत्ते अदा करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. रा. सावंत )
लेखा अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई-२०.
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
अपर पोलीस आयुक्त, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, पोलीस बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे. (५ प्रती)
विशेष पोलीस महानिरीक्षक, एस.सी.आर.बी, पुणे. (५ प्रती)
उपसंचालक, यशदा, पुणे.
विशेष पोलीस महानिरीक्षक / कारागृह महानिरीक्षक, पुणे.
पोलीस आयुक्त, पुणे. (६प्रती)
पोलीस उपमहानिरीक्षक, विशेष सुरक्षा प्रशिक्षण विद्यालय, वडाची वाडी, पुणे. (३ प्रती)
पोलीस उपमहानिरीक्षक, मोटार परिवहन, औंध,पुणे.
पोलीस उपमहानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, पुणे.
समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट क्र.१, पुणे.
पोलीस उपायुक्त, पीसीआर, पुणे.
सर्व संबंधीत मापोसे अधिकारी.
अवर सचिव, कार्यासन पोल-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती.

A.GR.50% D.A Merging A

| अ.क्र. | मापोसे अधिका-यांचे नांव | पदनाम | दि.१.४.२००४ रोजीचे मूळ वेतन | दि.१.४.२००४ रोजी देय असलेला महागाई भत्ता ६१% (४) | दि.१.४.२००४ रोजी देय असलेला एकूण महागाई भत्त्यातील मूळ वेतनाच्या ५०% एवढा सममूल्य महागाई भत्ता (Dearness Pay) (४) | महागाई भत्ता आणि घरभाडयाच्या परिगणनेसाठी एकूण वित्तलब्धी (मूळ वेतन + D.P.) (४+६) | नवीन सुत्रानुसार दिनांक १.४.२००४ रोजी देय महागाई भत्ता ११% (७) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री. एस चक्रवर्ती | अ.पो.म.सं. | २३९७५/- | १४६२५/- | ११९८८/- | ३५९६३/- | ३९५६/- |
| २ | डॉ. आर.टी.राठोड | वि.पो.म.नि. | १९४००/- | ११८३४/- | ९७००/- | ~~९७००/-~~ २९१००/- | ३२०१/- |
| ३ | श्री. एस.ए.कक्कड | अ.पो.आ. | १६४००/- | १०००४/- | ८२००/- | २४६००/- | २७०६/- |
| ४ | श्रीमती अर्चना त्यागी | पो.उ आ. | १२७५०/- | ७७७८/- | ६३७५/- | १९१२५/- | २१०४/- |
| ५ | श्री. संतोष रस्तोगी | पो.अ. | १००००/- | ६१००/- | ५०००/- | १५०००/- | १६५०/- |
| ६ | श्री. आर.ई.पवार | पो.अ. | १३५००/- | ८२३५/- | ६७५०/- | २०२५०/- | २२२८/- |
| ७ | श्रीमती. जी.अरवती | पो.उ आ. | ८२७५/- | ५०४८/- | ४१३८/- | १२४१३/- | १३६५/- |
| ८ | श्री. चेरिंग दोर्जे | पो.उ आ. | ८५५०/- | ५२१६/- | ४२७५/- | १२८२५/- | १४११/- |